**गोरेवाडा प्राणी संगहालयाचे दैनंदिन कामकाज सुरळीत चालविण्याकरीता विविध सुविधा निर्माण करण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र.डब्ल्युएलपी ०५.२५/प्र.क्र.१३७/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २९ मे, २०२५

<u>वाचा :-</u>

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी १००९/प्र.क्र.११९/फ-१, दिनांक २९.११.२०११
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
३. व्यवस्थापकीय संचालक, फॉरेस्ट डेव्हलमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड, नागपूर यांचे पत्र क्रमांक: मुमहाव्य / औवशा / गोरेवाडा/ २०२४-२५ / प्र.क्र.१५४/४९४६, दिनांक २०.०३.२०२५.

<u>प्रस्तावना:-</u>

गोरेवाडा आंतरराष्ट्रीय प्राणिसंग्रहालय स्थापन करण्यास संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली असुन सदर प्रकल्पामध्ये गोंडवाना बायोपार्क, इंडीयन सफारी, आफ्रीकन सफारी, गोरेवाडा रिझर्व, बचाव केंद्र व प्रजनन केंन्द्र इत्यादी घटकांचा समावेश आहे.

गोरेवाडा प्राणी संगहालायाचे दैनंदिन कामकाज सुरळीत चालविण्याकरीता विविध सूविधा निर्माण करण्याच्या ३ अंदाजपत्रकास व्यवस्थापकीय संचालक, फॉरेस्ट डेव्हलमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये केली आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

गोरेवाडा प्राणी संगहालयाचे दैनंदिन कामकाज सुरळीत चालविण्याकरीता विविध सूविधा निर्माण करण्याच्या सोबतच्या विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे १२१२.३० लक्ष इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अनुषंगाने खालील अटींच्या अधिन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :

i. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
ii. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

iii. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे/नियमातील तरतूदींचा भंग होणार नाही तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

iv. अंदाजपत्रकातील बाबी मूळ ढोबळ बाबींच्या कार्यान्वयनाकरीता आहेत याची अंमलबजावणी पूर्वी खात्री करावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र.१३४ (१), १३४ (२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२९१३१६४९६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY CHANDRAKANT DHAGE

Digitally signed by UDAY CHANDRAKANT DHAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=d50c7e8b1126d276bbe49105f9d24fff67dc9032e4afab15f5d0d94a0ea6cf5a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=097E903F6E5707A0A9A3CDAEBE40C9235E8FDA1EE2C8C4EA7713D6497937DCED, cn=UDAY CHANDRAKANT DHAGE
Date: 2025.05.29 13:18:06 +05'30'

**( उदय ढगे )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम.,ली. नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. मुख्य महाव्यवस्थापक (औवशा), फॉरेस्ट डेव्हलमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड, नागपूर.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, एफजीझेड, नागपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

*******

शासन निर्णय क्रमांक डब्ल्युएलपी ०५.२५/प्र.क्र.१३७/फ-१, दिनांक:- २९ मे, २०२५ सोबतचे विवरणपत्र.

**(रु. लाखात)**

| **अ.क्र.** | **कामाचा तपशिल** | **अंदाजपत्रकाची रक्कम** |
|---|---|---|
| 1. | Estimate for extension of height of existing protection wall (3491 mtr long) with 1.5 m height G.I. Chainlink fencing with Y-Type concertina wire at top in Gorewada unit I & II | १८१.६८ |
| 2. | Construction of protection wall across the boundry (25.57 ha.) land in Gorewada | ५८०.६९ |
| 3. | Construction of protection wall in the boundry of survey no.3/1-2, compartment no.795 (South Gorewada) Boargaon Part, at New Katol Road Square (Total length=1735m) Gorewada | ४४९.९३ |
| | **Total** | **१२१२.३०** |

*******